सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य) या संवर्गातून कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गात पदोन्नती व पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः पीओजी-११२१/ प्र.क्र. २०७/ सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २ मार्च, २०२२

**संदर्भ :** सा. बां. विभाग शासन आदेश क्र.: पीओजी-११२१/प्र.क्र. २०७/सेवा-१, दिनांक १८.११.२०२१

**शासन आदेश :-**

संदर्भाधीन शासन आदेशातील अ. क्र. ४६ येथील श्री. महेश रामहरी नामदे, सहायक अभियंता श्रेणी-१ यांना निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात आलेली आहे. पदोन्नतीउपरांत कार्यकारी अभियंता (स्थापत्य) म्हणून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| क्र. | अधिकाऱ्याचे नाव | कार्यरत असलेले ठिकाण | पदस्थापनेचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. महेश रामहरी नामदे | सा. बां. उप विभाग, फलटण | सार्वजनिक बांधकाम विभाग, महाड | श्री. बामणे यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी |

२. श्री. बामणे यांच्या बदलीने पदस्थापनेचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. तसेच श्री. महेश रा. नामदे यांना संदर्भाधीन पदोन्नती आदेशातील अटी-शर्ती लागू राहतील.

३. संबधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. नामदे यांना पदोन्नतीउपरांत पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होण्यासाठी पदमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्यास सांगावे. तसेच, श्री. नामदे यांना पदोन्नतीउपरांत पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरित अवगत करावे.

४. श्री. नामदे यांनी कमीत कमी पदग्रहण अवधी घेऊन नव्या पदाचा पदभार स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. श्री. नामदे हे पदोन्नतीने पदस्थापनेच्या पदावर या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या विहीत मुदतीत रुजू न झाल्यास त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम-२३ कडे त्यांचे लक्ष वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

५. श्री. नामदे यांनी पदोन्नतीच्या पदावर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतन निश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प विहित मुदतीत न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११ (१) (ए) अनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेवून करण्यात येईल.

६. श्री. नामदे यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होताच पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०२१७१८३७५२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gangadhar
Mahajan Gaikwad

Digitally signed by Gangadhar Mahajan Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0d38ef6405f5cae15731340f134ce56f50e939ba034b962c317c33ce102270d0, serialNumber=5eeead19a0ef3d2434afccb36079e80e7ede5a45017ec3297470e90ae602404b, cn=Gangadhar Mahajan Gaikwad
Date: 2022.03.02 17:20:14 +05'30'

**( गं. म. गायकवाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई / कोकण / पुणे / नाशिक / औरंगाबाद / नांदेड/ अमरावती/ नागपूर / राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई,
३. मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, पुणे,
४. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
५. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
७. श्री. रत्नाकर के. बामणे, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, महाड,
८. श्री. महेश रा. नामदे, सहायक अभियंता श्रेणी-१, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, फलटण,
९. सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व अधीक्षक अभियंते,
१०. संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई,
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा / रायगड,
१३. सामान्य प्रशासन विभाग, का.-१३/१६-ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१५. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१६. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१७. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१८. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१९. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
२०. सर्व सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. कार्यासन आस्था-१/३, सेवा-६, संगणक कक्ष, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२. निवडनस्ती.